# प्रस्तावना.



विवेकानें ज्यांनीं सुघटित समाजा दिक्विलें,
महासिद्धान्ताचें हृदय रसिकत्वें उकलिलें,
लसद्भक्तिज्ञानें तरतरविला धार्मिक तरु,
तया ज्ञानेशातें विमल मतिनें वन्दन करूं.

**ज्ञानदेव महाराजांचें** महाराष्ट्रसंतमंडळांत अनेक बाजूंनीं अत्यन्त महत्त्व आहे. **तत्त्वज्ञानी, प्रेमळ ईश्वरभक्त,** सामाजिक नेते, अलौकिक योगी, ब्रह्मचारी, धर्मसंरक्षक, आणि प्रासादिक ग्रंथकार, अशा अनेक नात्यांनीं त्यांची निर्मळ कीर्ति आज साडेसहा शतकें अखंडपणें दिव्य घोषानें महाराष्ट्रांत दुमदुमत राहिली आहे. आणि त्यांतल्या त्यात 'ज्ञानेश्वरी' ग्रन्थाचे कर्ते आणि पंढरपुरच्या वैष्णवसंप्रदायाचे प्रवर्तक, या नात्यांनीं मननशील ज्ञानिजनाच्या, तसेंच भोळ्या भाविक धार्मिकांच्याही, जिव्हाळ्याशीं ते एकजीव होऊन राहिले आहेत.

ज्ञानदेवाचे वडील विठ्ठलपंत हे गोदातीरावरील पैठणजवळील आपेगांवच्या गोविंदपंत कुळकर्ण्यांचे चिरंजीव, अल्प वयांतच वेदाध्ययन व

---

१ 'ज्ञानेश्वर' असें जरी या सन्तशिरोमणींचें नांव सर्वतोमुखीं आहे, तरी ते आपल्या ग्रन्थांत सर्वत्र आपला उल्लेख 'ज्ञानदेव' याच नांवानें करतात, म्हणून आम्ही हेंच नांव प्रस्तावनेंत सर्वत्र योजिलें आहे. २ या ग्रन्थाचें मूळ नांव भगवद्गीतेवरील 'भावार्थदीपिका' टीका हें आहे, व सामान्यतः हा ग्रंथ 'ज्ञानेश्वरी' म्हणून लोकप्रसिद्ध आहे. ३ यालाच व्यवहारांत 'वारकरी पंथ' म्हणतात.

शास्त्राध्ययन करून विठ्ठलपंत मोठे ज्ञानसंपन्न व वैराग्यशील ईश्वरभक्त झाले. संसारांत त्यांचें मन रमेना. तीर्थक्षेत्रींच्या यात्रा कराव्या, भक्तमंडळीच्या सहवासाची जोड जोडावी, आणि ईश्वरसेवेंत आयुष्य सार्थकी लावावें, अशी त्यांच्या मनाला सारखी ओढ लागली होती. यामुळे कुमारावस्थेंतच ते जे तीर्थाटनाकरितां घरांतून बाहेर पडले, ते निरनिराळ्या क्षेत्रांचें दर्शन घेत घेत पुण्याजवळ आले. आळंदीस सिधोपंत कुळकर्णी नावाचे एक सुखवस्तु व भाविक सज्जन होते. सिद्धेश्वराच्या देवळांत उतरलेल्या या तरुण पायस्थ ब्राह्मणाची ती ज्ञानसंपन्न मुद्रा, निर्मळ भावयुक्त वृत्ति, आणि कर्मनिष्ठ आचरण, हीं पाहून सिधोपंतांनी आपली उपवर कन्या त्यास देण्याचें मनांत योजले, व त्याप्रमाणें त्यांनी विठ्ठलपंताजवळ बोलणेंही लावलें. विठ्ठलपंतांनीं त्यांना एकदम निकाली जबाब दिला नाहीं, पण त्यांना लवकरच त्या मुलीचें पाणिग्रहण करण्या बद्दल स्वप्नदृष्टान्त झाला, आणि हाच ईश्वरी निर्देश समजून विठ्ठलपंतांनी सिधोपंतांच्या मुलीशीं लग्न करून घरसंसार थाटला.

विठ्ठलपंतांनी दारपरिग्रह केला खरा, पण त्यांचें चित्त कांहीं संसारांत लागेना. आपण निष्कारण या गुंत्यांत स्वतःला गुरफटून घेतलें, असें त्यांचें मन त्यांस खाऊ लागलें. त्यांची स्त्री रुक्मिणी ही मोठी पतिपरायण होती, पण पतीचें चित्त मुठींत ठेवणें हें तिला पारा मुठींत धरण्याइतकेंच अवघड झालें. विठ्ठलपंत अगदीं उदासीनपणें ईश्वरभजनांत दंग असत, व त्यांना तीर्थयात्राचा ध्यास सारखा लागलेला असे. लग्न झाल्यापासून विठ्ठलपंत आळंदीस बरेच दिवस राहिले. एकदां सासुरवाडच्या सर्व मंडळीसह ते पंढरपूरच्या यात्रेस गेले, आणि तो काळ मात्र त्यांना मोठ्या सुखानंदाचा झाला. यानंतर ते सर्व मंडळीसह आपेगांवास आई-बापाकडे गेले. पण सूनमुख पाहण्याचें सौख्य फार दिवस भोगण्याचें विठ्ठलपंताच्या मातापितरांच्या नशीबीं नव्हतें. तीं लवकरच कैलासवासी

झाली, आणि विठ्ठलपंत आतां स्वतंत्र गृहपति झाले. परंतु दिवसेंदिवस त्यांचें वैराग्य वाढीस लागलें, आणि आतां हा संसाराचा गाडा कसा चालणार, या चिन्तेनें रुक्मिणीबाई झुरणीस लागली, अखेर सिधोपंतांनीं आपेगांवास येऊन या जोडप्यास आळंदीस नेलें. पण या धारेपालटानें विठ्ठलपंतांच्या वृत्तींत काडीमात्रही पालट झाला नाहीं. उलट, पोटीं सन्तान नसल्यामुळें त्यांच्या विरक्त वृत्तीला जोरच चढला. शेवटीं एक दिवस ते नदीवर स्नानाला म्हणून जे बाहेर पडले, ते परत आलेच नाहींत !

घरांतून बाहेर पडल्यावर विठ्ठलपंतांनीं तडक काशीक्षेत्राची वाट धरली, आणि काशीस पोंचल्यावर त्यांनीं आपल्या संसाराची खरी हकीकत न सांगतां, रामानंद स्वामी यांचा उपदेश घेऊन संन्यासदीक्षेचा स्वीकार केला !

इकडे रुक्मिणीबाई आळंदीस दुःखसागरांत निमग्न झाल्या. पतीच्या आकस्मिक नाहींसें होण्यानें त्यांना लोकांत तोंड काढावयासही लाज वाटूं लागली. पति कोठें असतील, आपली पुढें अवस्था काय होणार, आतां या जिण्यांत काय अर्थ आहे, इत्यादि विचारांनीं त्यांचें अन्तःकरण अगदीं विदीर्ण होऊन गेलें. अखेर, वेळ जाण्याकरितां पतिचिन्तन करीत, एकभुक्त राहून, पिंपळाला प्रदक्षिणा घालण्याचें व रात्रिदिवस ईश्वरभजन करण्याचें व्रत रुक्मिणीबाईनीं चालविलें.

अशा रीतीनें रुक्मिणीबाईची कयात कालक्रमणा चालली असतां, एकदां असा योग जुळून आला, कीं रामानंदस्वामी रामेश्वरच्या यात्रेकरितां निघाले असतां, वाटेंत त्यांचा आळंदीस मुक्काम झाला. ते मारुतीच्या देवळांत उतरले, आणि संध्याकाळीं देवदर्शनास आलेल्या रुक्मिणीबाईनें त्यांचें चरणवंदन केलें. तेव्हां स्वामींनीं नेहमींच्या सरावाप्रमाणें त्या सौभाग्यवतीस 'पुत्रवती भव' म्हणून आशीर्वाद दिला. हा सहजासहजीं मिळालेल्या आशीर्वादानें रुक्मिणीबाईस हंसूं आलें आणि तो निष्फळ होणार म्हणून बाईस वाटलें. बाईची ही अवस्था पाहतांच

स्वामींनीं खोदखोदून चौकशी केली, आणि बाईच्या नाहींशा झालेल्या *पतीच्या खाणाखुणा कळल्यावर आपला नूतन शिष्य 'चैतन्याश्रम'* हाच बाईचा पति असावा, अशी त्यांस खात्री वाटूं लागली. पण हा शिष्य त्या वेळीं त्यांचे बरोबर नव्हता, म्हणून स्वामी लगोलग काशीस परत आले, आणि त्यांनीं चैतन्याश्रमाचा जाब घेतला. सर्व कांहीं आतां उघडकीस आलें आहे, हें पाहून चैतन्याश्रमानें आपला अपराध कबूल केला. सन्तानहीन स्त्रीला तिच्या अनुमतीवांचून टाकून देणारा गृहस्थ जर *संन्यास घेईल आणि त्याला ती दीक्षा कोणी देईल, तर ते* दोघेही दोषी ठरतात, हें जाणून या दोषक्षालनार्थ स्वामींनीं, 'चैतन्याश्रमानें आळंदीस परत जाऊन गृहस्थाश्रमाचा स्वीकार करावा,' अशी आज्ञा केली, आणि खजील झालेल्या चैतन्याश्रमानें ती निमूटपणें पाळली. याप्रमाणें विठ्ठलपंत संन्याशाचे पुन्हां गृहस्थ बनले.

विठ्ठलरुक्मिणींची वियोगाची साडेसाती संपून, तीं आतां एकत्र नांदूं *लागलीं खरीं*, पण त्यांच्यावर आतां समाजक्षोभाचें वादळ वाजूं लागलें. संन्यासी पुन्हां घरभारी झाला, ही गोष्ट केवळ अद्भुत होती; शिवाय, त्यामुळें गृहस्थाश्रम व सन्यासाश्रम या दोघांसही उणेपणा येऊन समाजांत घजबजपुरी माजण्याचा फार संभव असल्यामुळें, आळंदीकर ब्राह्मणांनीं विठ्ठलपन्तांना वाळींत टाकलें. अर्थात्‌ त्यांना याबद्दल वाईट वाटलेंच, परंतु आपलाच दाम खोटा असल्यामुळें त्यांस कांहींच *बोलतां येईना.*

बहिष्कृत स्थितींत विठ्ठलपन्त आपला सर्व ..., ग्रन्थवाचन, आत्मचिन्तन, व ईश्वरभजन, यांत घालवीत असत आणि त्यानें त्यांची समाधानवृत्ति टिकाव धरून राहिली. रुक्मिणीबाईही, पतिसेवेंत आपल्याला सर्व कांहीं लाभलें, असें समजून आनंदांत असत. परंतु गृहाचाराचा स्वीकार केल्यावर लवकरच सन्तति होऊं लागली, आणि चिन्तेच्या वाढीला

नवाच भागा सांपडला. विठ्ठलरुक्मिणीस एकंदर चार अपत्यांचा लाभ झाला, तीन मुलगे व एक मुलगी. ज्येष्ठ चिरंजीव निवृत्ति, जन्मशक ११९५; दुसरे ज्ञानदेव, जन्मशक ११९७, तिसरे सोपान, जन्मशक ११९९; आणि अखेरचें अपत्य मुलगी मुक्ताबाई, जन्मशक १२०१.

विठ्ठलपन्तांस मुलें झाल्यावर मात्र या मुलांचें पुढें कसें होणार याविषयीं त्यांस चिन्तेचा हृद्रोग लागला. हीं सर्वच मुलें मोठीं तैलबुद्धीचीं होतीं, आणि विठ्ठलपंत स्वतः चांगले व्युत्पन्न असल्यामुळें मुलांच्या विद्याभ्यासांत कोणताही व्यत्यय आला नाहीं. पण जेव्हां निवृत्तिनाथ सात वर्षांचे झाले व त्याचें उपनयन न झाल्यास त्यांस ब्राह्मणत्वच येणार नाहीं, असा प्रसंग येऊन ठेपला, तेव्हां मात्र विठ्ठलपन्त अगदीं गयावया आले व ' आम्हांस पंक्तिपावन करून घ्या ' म्हणून त्यांनीं आळंदीकर ब्राह्मणांची पायधरणी केली, परंतु त्यांस कोणीच आश्वासन देईना.

असो. मुलें मोठीं होत चाललीं, तीं ज्ञानसंपन्न होऊन अधिकारीही बनलीं, पण मौंजीबंधनादि संस्कार न घडल्यामुळें तीं ब्राह्मणत्वास मुकत आहेत, हें पाहून विठ्ठलपंतांचा जीव दुःखानें अगदीं गुदमरून जात होता. आळंदीकर वळतना, तेव्हां ते आपल्या मुलांबाळांस घेऊन आपेगांवास गेले, तेथील ब्राह्मणांनीं त्यांना स्पष्ट सांगितलें कीं तुमच्या दोषास देह-दंडावांचून दुसरें प्रायश्चित्त नाहीं. अखेर विठ्ठलपंत अगदींच कंटाळले व ते आपल्या मुलांस वाऱ्यावर सोडून भार्येसह प्रयागास गेले व तेथेंच दोघांनीं जलसमाध घेतली !

अशा प्रकारें निवृत्तिदेवादि भावंडें आतां केवळ उघडीं व पोरकीं पडलीं. परंतु त्यांनीं धीर न सोडतां नुसतें कोराम मागून आपेगांव व पैठण येथें दिवस काढले व ब्राह्मणांनीं आपल्यास पंक्तिपावन करून घ्यावें, म्हणून प्रयत्न चालविला. या मुलांची वृत्ति, चर्या, विलक्षण बुद्धिमत्ता, व शील-संपन्नता, हीं पाहून पैठणकरांचें मन द्रवलें. वास्तविक या मुलांच्या

शुद्धीकरणाचा प्रश्न फार नाजूक व मानगडीचा होता. संन्याशी होऊन पुन्हां कोठंटी खाऊन घरसंसार थाटणाऱ्या इसमाला, कोणतें प्रायश्चित्त देऊन समाजपावन करावा याला शास्त्राधारच पैठणकरांस सांपडेना; त्यांनीं एकंदर सर्व प्रकरणाचा सामदामानें विचार करून फार युक्तीनें निर्णय लाविला. एकदा संन्यास घेतलेल्या व्यक्तीनें पुन्हां गृहस्थाश्रमी होण्याची प्रथा समाजांत पडूं नये आणि निवृत्तिदेवादि अलौकिक बुद्धिमान्, सच्छील, व आदरणीय, व्यक्ति समाजातून फुटूं नयेत, या दोन्हीं गोष्टी त्यांस साधावयाच्या होत्या, व त्या त्यांनीं साधल्या. त्यांनीं असा निर्णय दिला, कीं,

अनन्य भक्ती हरिपादपद्मीं
निष्ठा धरा केवळ सौख्यसद्मीं ।
तीव्रानुतापें भजनासि सारा
टाकोनि मायामय हा पसारा ॥
चित्तीं चिदानंद धरोनि राहा
चैतन्य तें एक अखंड पाहा ।
या पद्धतीनेंच तराल लोकीं
यावेगळा मार्ग तुम्हां नसो कीं ॥
जितेंद्रियत्वेंचि वसा अखंड
न वाढवा संसृतिकामबंड ।
वैराग्ययोगेंचि धरोनि पिंड
वर्ता, तुम्हां निष्कृति हे उदंड ॥—निरंजन माधव.

अशा प्रकारें पैठणकर ब्राह्मणसमाजाच्या संमतीनेंच हीं चारी भावंडें ब्राह्मणसमाजांत राहून ब्रह्मचर्यानें पालन करतीं झालीं.

अग्रो. शा. श. १२०९ मध्यें शुद्धीकरणप्रकरण निकालीं लागल्यावर, हीं चारी भावंडें नेवाशास येऊन कांहीं वर्षे राहिलीं. हें गांव नगर जिल्ह्यांत प्रवरेच्या कांठीं दोन बाजूंस वसलेलें आहे, व गांवच्या दोन भागांस

खंडोबाचें नेवासें व म्हाळसामोदनीराजाचें नेवासें अशी नांवें आहेत. पैकीं दक्षिणतीरावरील म्हाळसेच्या देवालयांत ज्ञानदेवांनीं आपली श्रीमद्भगवद्गी-तेवरील भावार्थदीपिका म्हणजेच प्रस्तुतची ज्ञानदेवी उर्फ ज्ञानेश्वरी शा. श. १२१२ मध्यें रचून पुरी केली. ज्ञानदेव महाराज सांगतातः—

ऐसें युगीं वरि कलीं, आणि महाराष्ट्रमंडळीं।
श्रीगोदावरीच्या कूळीं दक्षिणिलीं, १८०२
त्रिभुवनैकपवित्र अनादि पंचक्रोशक्षेत्र।
जेथ जगाचें जीवनसूत्र श्रीमहालया असे, १८०३
तेथ इंदुवंशविलासु, जो सकलकलानिवासु।
न्यायातें पोषी क्षितीशु श्रीरामचंद्रु, १८०४
तेथ महेशान्वयसंभूतें श्रीनिवृत्तिनाथसुतें।
केलें ज्ञानदेवें गीते देशीकार लेणें. १८०५. अध्याय १८

ज्ञानदेवीची रचना शा. श. १२१२ त समाप्त झाली, म्हणजे हें ग्रंथ-रत्न जन्मास आलें, त्या वेळीं त्याचा जनक केवळ पंधरासोळा वर्षांचा होता. ज्ञानदेवांच्या अलौकिक बुद्धिसामर्थ्याची कल्पना होण्याला ही एव-ढीच साक्ष पुरेशी आहे.

ज्ञानदेवीची रचना सामान्य लोकांना परमार्थाची ओळख करून देऊन त्यांना भक्तिमार्गाला लावण्याकरितां झाली, हें स्वयंसिद्धच आहे. परंतु श्रोत्यांना हें परमार्थाचें विवेचन रूक्ष व शुष्क वाटूं नये, म्हणून तें रसाळ काव्यमय करण्याचाही त्यांनीं चंग बांधला होता. काव्यांत शृंगाररसाला बहुशः प्राधान्य असतें, परंतु शृंगारावरही शांतरस ताण करील असें सोज्वळ काव्य रचण्याची आकांक्षा ज्ञानदेवांनीं मनांत धर[illegible] होती. संस्कृताला ते बहुमान देतच असत. पण प्राकृत मराठीही गीर्वाणवाणीच्या

पाहिल्या, पण अपपाठामुळें मूळच्या शुद्ध प्रथाची फार घाण झाली आहे, असें त्यांच्या ध्यानीं आलें तेव्हां एकनाथांनीं अनेक प्रती जुळवून ज्ञानदेवीची एक शुद्ध प्रत तयार केली एकनाथस्वामी सांगतात —

**श्रीशके पधराश साहोत्तरीं, तारणनामसंवत्सरीं ।**
**एका जनार्दनें अत्यादरीं गीताज्ञानेश्वरी प्रतिशुद्ध केली ॥**
**ग्रंथ पूर्वींच अतिशुद्ध, परि पाठांतरीं शुद्ध अबद्ध ।**
**तो शोधूनिया एवंविध प्रतिशुद्ध सिद्ध ज्ञानेश्वरी ॥**

यावरून एकनाथाच्या पूर्वींच ज्ञानदेवी ग्रंथाचा प्रसार पुष्कळ झाला होता व त्यांत लेखकांच्या चुकीनें किंवा निष्काळजीपणानें अनेक अपपाठ घुसून अर्थाचा खेळखंडोबा उडाला होता, हें उघड आहे एकनाथांनीं ज्ञानदेवीचा जीर्णोद्धार केला, याचा अर्थ ज्ञानदेवी ग्रंथ कोठें कोनाकोपऱ्यात अंधारांत गुडूप झाला होता, तो पुन्हां एकनाथांनीं लोकांच्या नजरेस आणला असा नव्हे, तर लोकात प्रचलित असलेल्या प्रतींतील अपपाठ त्यांच्या लक्ष्यांत आल्यावरून त्यांनीं त्या ग्रंथाची एक शुद्ध प्रत तयार केली, व तिचा वारकरी पथांत प्रसार केला, इतकाच आहे

एकनाथांनीं ज्ञानदेवांच्या समाधीचा शोध लाविला, व आळंदीच्या यात्रेची प्रथा सुरू केली, ती अद्याप चालू आहे

मुरुड-जंजिरा,
भाद्रपद, शके १८५०

**वा. अ. भिडे**



मोरोपंतकृत

# श्रीमद्भगवद्गीतास्तुति.



श्रीमद्भगवद्गीते! वर्णावें आदरें तुला नमुनी।
सर्वोपनिषत्सारे माते! तुज पाहती तुला न मुनी॥ १॥
तुज सोडुनि तरि तरते, अन्याचे जीव जरि उपासक ते,।
त्यजुनि अमृत, लंघाया मृतितें, सेवूनि जरि तृषा, सकते.॥२॥
भगवद्गीते! ख्यात्या अधिका तुजहुनि सुधानदी नाहीं;।
त्वद्भक्तां तापांहीं भय, जेंवि दिजे सुधा न दीनांहीं.॥ ३॥
तुज भजल्या, संसारीं वसतां, गतिलाभ होय जो, गीते!।
त्यासि न पात्र भ्रमति, श्रमति व्यर्थचि तपोनि, जोगी ते.॥४॥
सेवुनि सुधाहि, तापति कामक्रोधार्त सतत रोगी ते;।
संसारीं, प्राशुनि तुज, हा रामतनूज नत तरो, गीते!॥ ५॥
जय मोहमहिषमर्दिनि! जय भगवति गेयगुरुगणे गीते!।
जरि झाली नसतीस प्रकटा तूं, यतिहि बहु भवा भीते.॥६॥
तव सचिव द्वैपायनशंकरमधुसूदनादि योगी ते,।
ज्ञानेश प्रतिनिधि, हें वर्णन तुझिया, मनास यो, गीते!॥ ७॥
युवराज तुझा वामन, वाम न मानूं, तुवांचि मानावें;।
गुरु लघु कविंनीं प्रभुतें नित्य यथामति विशंक वानावें॥८॥
भगवति! शुचिकीर्ति तुझी सुमति ज्ञानेश्वरी प्रिया आली।
झाली विश्वख्याता, हे कार्या बहु जनांचिया आली.॥ ९॥
नेती तिकडे जासी, भगवति! बहुमत इचें तुला उक्त.।
ज्ञानेश्वरीस जन जे अनुसरले, त्यांसि करिसि तूं मुक्त!॥१०॥

श्रीमद्भगवद्गीते ! नियमें जो करितसे तुझा पाठ, ।
तारिसि तया, तयाच्या घेउनि कामादि शत्रुंचीं पाठ. ॥ ११ ॥
त्यातें मुक्ति वरि, तुझे, गीते ! अध्याय-पाठ अठरा ज्या, ।
लोकपति त्यजुनि जशी ती दमयंती, करूनि हठ, राजा. ॥ १२ ॥
एकचि अध्याय पुरे, किंबहुना श्लोक एक, हा नियम. ।
गीते ! त्वदाश्रितजनीं तिळहि करिल न बहुमानहानि यम. ॥ १३ ॥
पट्टु, अघ हरुनि जलधिचें, असुर मथुनि, शंभुचें उदार पण, ।
हृतभवभीते गीते ! अत्यंताद्भुत तुझें उदारपण. ॥ १४ ॥
साधनसंपत्तिपरा झाल्या तुज नम्रकंधरा आर्या ।
भावें समर्पिल्या या तव चरणीं नहुनि पंधरा आर्या. ॥ १५ ॥

---

## श्रीज्ञानेश्वरीची सप्ताहपद्धति

श्रावण वद्य १ ते वद्य ८.

| दिवस | अध्याय | सकाळीं | दुपारीं |
|---|---|---|---|
| १ | ५ | गीताश्लोक | ओंव्या |
| २ | ६, ७ | ,, | ,, |
| ३ | ८, ९, १० | ,, | ,, |
| ४ | ११, १२ | ,, | ,, |
| ५ | १३, १४ | ,, | ,, |
| ६ | १५, १६, १७ | ,, | ,, |
| ७ | १८ | ,, | ,, |
| ८ | ... ... ... | गीता सर्व वाचणें. | |

# श्रीज्ञानेश्वरीची अध्यायानुक्रमणिका

" यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।
तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥ "



भरोनि सद्भावाची अंजुळी ।
मियां ओंवियाफुलें मोकळी ।
अर्पिलीं अंघ्रियुगुलीं ।
विश्वरूपाच्या ॥

---

हृदयस्थ
श्रीकृष्ण परमात्म्याचे
चरणयुगुलीं
समर्पण.



नमामि सद्गुरुं शांतं सच्चिदानंदविग्रहम् ।
पूर्णब्रह्मपरानंदमीशमालंदिवल्लभम् ॥ १ ॥



जो ज्ञानराज भगवान् श्रवणीं सुज्ञान दे, वदे वाचा
अवतार गमे अकरावा कां सुज्ञा न देवदेवाचा ?
श्रीमद्भगवद्गीताव्याख्या केली जगासि ताराया,
सारा या सद्ग्रंथा सेविति संसारताप साराया.

ॐ

# नमः परमात्मने ।



## मंगलम् ।

पार्थाय प्रतिबोधितां भगवता नारायणेन स्वयं
व्यासेन ग्रथितां पुराणमुनिना मध्येमहाभारतम् ।
अद्वैतामृतवर्षिणीं भगवतीमष्टादशाध्यायिनी-
मब त्वामनुसंदधामि भगवद्गीते भवद्वेषिणीम् ॥ १ ॥

जी प्रेमें भगवन्त कृष्ण कथिती ज्ञानार्थ पार्थाप्रती,
जी व्यासीं ग्रथिली पुराणमुनिनीं मांव महाभारतीं,
जी अद्वैतसुधा उदार वितरी अष्टादशाध्यायिनी,
माते ! त्या तुजला स्मरेन भगवद्गीते ! भवध्वंसिनी ॥ १ ॥

वसुदेवसुतं देवं कंसचाणूरमर्दनम् ।
देवकीपरमानंदं कृष्णं वंदे जगद्गुरुम् ॥ २ ॥

ॐ नमो भगवते वासुदेवाय

# श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय पहिला

॥ श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ श्रीगोपालकृष्णाय नमः ॥

ॐ नमो जी आद्या । वेदप्रतिपाद्या ।
जय जय स्वसंवेद्या । आत्मरूपा ॥ १ ॥
देवा तूंचि गणेशु । सकलार्थमतिप्रकाशु ।
म्हणे निवृत्तिदासु । अवधारिजो जी ॥ २ ॥
हें शब्दब्रह्म अशेष । तेचि मूर्ति सुवेष ।
तेथ वर्णवपु निर्दोष । मिरवत असे ॥ ३ ॥
स्मृति तेचि अवयव । रेखा आंगीकभाव ।
तेथ लावण्याची ठेव । अर्थशोभा ॥ ४ ॥
अष्टादश पुराणें । तींचि मणिभूषणें ।
पदपद्धती खेवणें । प्रमेयरत्नांचीं ॥ ५ ॥
पद्यबंध नागर । तेंचि रंगाथिलें अंबर ।
जेथ साहित्य वाणें सपूर । उजाळाचें ॥ ६ ॥
देखा काव्य नाटका । जें निर्धारितां सकौतुका ।
त्याचि रुणझुणती क्षुद्रघंटिका । अर्थध्वनि ॥ ७ ॥

---

१ ऐकावें. २ शब्दात्मक विश्व, वाङ्मय. ३ टव. ४ कोंदणें. ५ रंगीत, कापड. ७ माल, जिन्नस, रंग, वर्ण.

नाना प्रमेयांची परी । निपुणपणे पाहतां कुसरी ।
दिसती उचित पदें माझारीं । रत्नें भलीं ॥ ८ ॥
तेथ व्यासादिकांच्या मती । तेचि मेखळा मिरवती ।
चोखाळपणें झळकती । पल्लवसडका ॥ ९ ॥
देखा षड्दर्शनें म्हणिपती । तेचि भुजांची आकृति ।
म्हणऊनि विसंवादें धरिती । आयुधें हातीं ॥ १० ॥
तरी तर्कु तोचि परशु । नीतिभेदु अंकुशु ।
वेदांतु तो महारसु । मोदकु मिरवे ॥ ११ ॥
एके हातीं दंतु । जो स्वभावतां खंडितु ।
तो बौद्धमतसंकेतु । वार्तिकांचा ॥ १२ ॥
मग सहजें सत्कारवादु । तो पद्मकरु वरदु ।
धर्मप्रतिष्ठा तो सिद्धु । अभयहस्तु ॥ १३ ॥
देखा विवेकवंतु सुविमळु । तोचि शुंडादंडु सरळु ।
जेथ परमानंदु केवळु । महासुखाचा ॥ १४ ॥
तरी संवादु तोचि दशनु । जो समताशुभ्रवर्णु ।
देवो उन्मेषसूक्ष्मेक्षणु । विघ्नराजु ॥ १५ ॥
मज अवगमलिया दोनी । मीमांसा श्रवणस्थानीं ।
बोधमदामृत मुनी । अली सेविती ॥ १६ ॥
प्रमेयप्रवालसुप्रभ । द्वैताद्वैत तेचि निकुंभ ।
सरिसेपणें एकवटत इभ- । मस्तकावरी ॥ १७ ॥
उपरि दशोपनिषदें । जियें उदारें ज्ञानमकरंद ।
तियें कुसुमें मुगुटीं सुगंध । शोभती भलीं ॥ १८ ॥

---

१ पदराचे सोगे २ ज्ञानरूपी बारीक डोळे आहेत ज्याचे असा ३ घातल्या ४ प्रवाल=पोवळीं ५ गंडस्थळें ६ सलगपणानें

अकार चरणयुगुल । उकार उदर विशाल ।
मकारु महामंडल । मस्तकाकारें ॥ १९ ॥
हे तीन्ही एकवटले । तेथ शब्दब्रह्म कवळलें ।
तें मियां श्रीगुरुकृपा नमिलें । आदिबीज ॥ २० ॥
आतां अभिनववाग्विलासिनी । जे चातुर्यकलाकामिनी ।
ते शारदा विश्वमोहिनी । नमिली मियां ॥ २१ ॥
मज हृदयीं सद्गुरु । जेणें तारिलों हा संसारपूरु ।
म्हणऊनि विशेषें अत्यादरु । विवेकावरी ॥ २२ ॥
जैसें डोळयां अंजन भेटे । ते वेळीं दृष्टीसी फांटा फुटे ।
मग वास पाहिजे तेथ प्रगटे । महानिधि ॥ २३ ॥
कां चिंतामणि आलिया हातीं।सदा विजयवृत्ति मनोरथीं।
तैसा मी पूर्णकाम श्रीनिवृत्ति । ज्ञानदेवो म्हणे ॥ २४ ॥
म्हणोनि जाणतेन गुरु भजिजे । तेणें कृतकार्य होइजे ।
जैसें मूळसिंचनें सहजें । शाखापल्लव संतोषती ॥ २५ ॥
कां तीर्थे जियें त्रिभुवनीं । तियें घडती समुद्रावगाहनीं ।
ना तरी अमृतरसास्वादनीं । रस सकळ ॥ २६ ॥
तैसा पुढतपुढती तोचि । मियां अभिवंदिला श्रीगुरुचि ।
जो अभिलषित मनोरुचि । पुरविता ॥ २७ ॥
आतां अवधारा कथा गहन।जे कळाकौतुका जन्मस्थान ।
कीं अभिनव उद्यान । विवेकतरूचें ॥ २८ ॥
ना तरी सर्व सुखाची आदि । जे प्रमेयमहानिधि ।
नाना नवरससुधाब्धि । परिपूर्ण हे ॥ २९ ॥
कीं परमधाम प्रकट । सर्व विद्यांचें मूळपीठ ।
शास्त्रजातां वसौटें । अशेषांचें ॥ ३० ॥

१ किंवा २ वसतिस्थान.

ना तरी सकळ धर्मांचें माहेर । सज्जनांचें जिव्हार ।
लावण्यरत्नभांडार । शारदेचें ॥ ३१ ॥
नाना कथारूपें भारती । प्रकटली असे त्रिजगतीं ।
आविष्करोनि महामतीं । व्यासाचिये ॥ ३२ ॥
म्हणोनि हा काव्यां रावो । ग्रंथगुरुवतीचा ठावो ।
एथूनि रसां झाला आवो । रसाळपणाचा ॥ ३३ ॥
तेवींचि आइका आणीक एक।एथूनि शब्दश्री सच्छास्त्रिक
आणि महाबोधीं कोंवळीक । दुणावली ॥ ३४ ॥
एथ चातुर्य शाहणें झालें । प्रमेयं रुचीस आलें ।
आणि सौभाग्य पोखलें । सुखाचें एथ ॥ ३५ ॥
माधुर्यीं मधुरता । शृंगारा सुरेखता ।
रूढपण उचितां । दिसलें भलें ॥ ३६ ॥
एथ कळाविदपण कळां । पुण्यासि प्रतापु आगळा ।
म्हणऊनि जनमेजयाचे अवलीळा । दोष हरले ॥ ३७ ॥
आणि पाहतां नावेक । रंगीं सुरंगतेची आगळिक ।
गुणां सुगुणपणाचें बिक । बहुवस एथ ॥ ३८ ॥
भानुचेनि तेजें धवळलें । जैसें त्रैलोक्य दिसे उजाळिलें ।
तैसें व्यासमती कवळिलें । मिरवे विश्व ॥ ३९ ॥
का सुक्षेत्रीं बीज घातलें । तें आपुलियापरी विस्तारलें ।
तैसें भारतीं सुरवाडलें । अर्थजात ॥ ४० ॥
ना तरी नगरांतरीं वसिजे । तरी नागराचि होइजे ।
तैसें व्यासोक्तितेजें । धवळत सकळ ॥ ४१ ॥

---

१ गुरुवती=गौरव प्रौढी २ आगर, स्थान ३ कोमलता ४ भगवत्प्रेम ५ विशेष, अधिक ६ क्षणभर ७ तेज ८ सुखावले ९ अर्थमात्र, सर्व अर्थ १० सभ्य व बहुश्रुत.

कीं प्रथमवयसाकाळीं । लावण्याची नव्हाळी ।
प्रकटे जैसी आगळी । अंगनाअंगीं ॥ ४१ ॥
ना तरी उद्यानीं माधवी घडे।तेथ वनशोभेची खाणी उघडे।
आदिलापासोनि अपाडें । जियापरी ॥ ४३ ॥
नाना घनीभूत सुवर्ण । जैसें न्याहाळितां साधारण ।
मग अळंकारीं वरवेपण । निवाडु दावी ॥ ४४ ॥
तैसें व्यासोक्ती अळंकारिलें । आवडतें वरवेपण पातलें ।
तें जाणोनि काय आश्रयिलें । इतिहासीं ॥ ४५ ॥
नाना पुरतिये प्रतिष्ठेलागीं । सानीव धरूनि आंगीं ।
पुराणें आख्यानरूपें जगीं । भारता आलीं ॥ ४६ ॥
म्हणऊनि महाभारतीं नाहीं । तें नोहेचि लोकीं तिहीं ।
येणें कारणें म्हणिपे पाहीं । व्यासोच्छिष्ट जगत्रय ॥ ४७ ॥
ऐसी जगीं सुरस कथा । जे जन्मभूमि परमार्था ।
मुनि सांगे नृपनाथा । जनमेजया ॥ ४८ ॥
जे अद्वितीय उत्तम । पवित्रैक निरुपम ।
परम मंगलधाम । अवधारिजो ॥ ४९ ॥
आतां भारतकमळपरागु । गीताख्यु प्रसंगु ।
जो संवादला श्रीरंगु । अर्जुनेसीं ॥ ५० ॥
ना तरी शब्दब्रह्माब्धि । मथियला व्यासबुद्धी ।
निवडिलें निरवधि । नवनीत हें ॥ ५१ ॥
मग ज्ञानाग्निसंपर्कें । कढसिलें विवेकें ।
पद आलें परिपाकें । आमोदासी ॥ ५२ ॥

---

१ तारुण्याच्या पहिल्या भरांत. २ लहानापासून मोठ्यापर्यंत. ३ निर्णय, निश्चय. ४ अपरिमित, अपार, विपुल.

जें अपेक्षिजे विरक्तीं । सदा अनुभविजे संतीं ।
सोऽहंभावें पारंगतीं । रमिजे जेथ ॥ ५३ ॥
जें आकर्णिजे भक्तीं । जें आदिवंद्य त्रिजगतीं ।
ते भीष्मपर्वीं संगती । सांघिजैल ॥ ५४ ॥
जे भगवद्गीता म्हणिजे । जे ब्रह्मेशांनीं प्रशंसिजे ।
जे सनकादिकीं सेविजे । आदरेंसीं ॥ ५५ ॥
जैसें शारदीयेचे चंद्रकळे- । मार्जीं अमृतकण कोंवळे ।
ते वेंचिती मनें मवाळें । चकोरतलगें ॥ ५६ ॥
तियांपरी श्रोतां । अनुभवावी हे कथा ।
अति हळुवारपण चित्ता । आणुनियां ॥ ५७ ॥
हे शब्देंवीण संवादिजे । इंद्रियां नेणतां भोगिजे ।
बोलाआदि झोंबिजे । प्रमेयासी ॥ ५८ ॥
जैसे भ्रमर परागु नेती । परी कमळदळें नेणती ।
तैसी परी आहे सेविती । ग्रंथीं इये ॥ ५९ ॥
कां आपुला ठावो न सांडितां । आलिंगिजे चंद्रु प्रकटतां ।
हा अनुरागु भोगितां । कुमुदिनी जाणे ॥ ६० ॥
ऐसेनि गंभीरपणें । स्थिरावलेनि अंतःकरणें ।
आथिला तोचि जाणे । मानूं इये ॥ ६१ ॥
अहो अर्जुनाचिये पांतीं । जे परिसणया योग्य होती ।
तिहीं कृपा करूनि संतीं । अवधान द्यावें ॥ ६२ ॥
हे सलगी म्यां म्हणितलें । चरणांलागोनि विनविलें ।
प्रभू सखोल हृदय आपुलें । म्हणौनियां ॥ ६३ ॥
जैसा स्वभावो मायबापांचा । अपत्य बोले जरी बोबडी वाचा ।
तरी अधिकचि तयाचा । संतोष आथी ॥ ६४ ॥

१ अहंब्रह्म या बुद्धीनें. २ सिद्धांनीं. ३ तलग=पिलूं. ४ पंक्तीला.

तैसा तुम्हीं मी अंगिकारिला । सज्जनीं आपुला म्हणितला
तरी उणें सहजें उपसाहला । प्रार्थू काई ॥ ६५ ॥
परी अपराधु तो आणीक आहे । जें मी गीतार्थु कवळूं पाहें ।
ते अवधारा विनवूं लाहें । म्हणौनियां ॥ ६६ ॥
हें अनावर न विचारितां । वायांचि धिंवसा उपनला चित्ता ।
येऱ्हवीं काइ भानुतेजीं खद्योता । शोभा आथी ॥ ६७ ॥
कीं टिटिमू चांचूवरी । माप सुँये सागरीं ।
मी नेणतु त्यापरी । प्रवर्ते येथ ॥ ६८ ॥
आयका आकाश गिंवसावें ।
तरी आणीक त्याहूनि थोर होआवें ।
म्हणऊनि अपाडु हें आघवें । निर्धारितां ॥ ६९ ॥
तया गीतार्थाची थोरी । स्वयें शंभू विवरी ।
जेथ भवानी प्रश्नु करी । चमत्कारोनी ॥ ७० ॥
तेथ हरु म्हणे नेणिजे । देवी जैसें कां स्वरूप तुझें ।
तैसें हें नित्य नूतन देखिजे । गीतातत्त्व ॥ ७१ ॥
हा वेदार्थसागरु । जया निद्रिताचा घोरु ।
तो स्वयें सर्वेश्वरु । प्रत्यक्ष अनुवादला ॥ ७२ ॥
ऐसें जें अगाध । जेथ वेडावती वेद ।
तेथ अल्प मी मतिमंद । काय होयें ॥ ७३ ॥
हें अपार कैसेनि कवळावें । महातेज कवणें धवळावें ।
गगन मुठीं सुँवावें । मशकें केवीं ॥ ७४ ॥
परी एथ असे एकु आधारु । तेणेंचि बोलें मी सधरु ।
जें सानुकूळ श्रीगुरु । ज्ञानदेवो म्हणे ॥ ७५ ॥

---

१ क्षमा करण्याला. २ हुरूप. ३ आहे. ४ घालते. ५ कोंदाळावें. ६ असाध्य, आटोक्याबाहेरचें. ७ धरावें.

येऱ्हवीं तरी मी मूर्खु । जरी जाहला अविवेकु ।
तरी संतकृपादीपकु । सोज्वळु असे ॥ ७६ ॥
लोहाचें कनक होये । हें सामर्थ्य परिसींच आहे ।
कीं मृतहीं जीवित लाहे । अमृतसिद्धी ॥ ७७ ॥
जरी प्रकटे सिद्धसरस्वती । तरी मुकया आथी भारती ।
एथ वस्तुसामर्थ्यशक्ती । नवल कायी ॥ ७८ ॥
जयातें कामधेनु माये । तयासी अप्राप्य कांहीं आहे ।
म्हणऊनि मी प्रवर्तो लाहें । ग्रंथीं इये ॥ ७९ ॥
तरी न्यून तें पुरतें । अधिक तें सरतें ।
करूनि घेयावें हें तुमतें । विनवितु असें ॥ ८० ॥
आतां देइजो अवधान । तुम्हीं बोलविल्या मी बोलेन ।
जैसें चेष्टे सूत्राधीन । दारुयंत्र ॥ ८१ ॥
तैसा मी अनुग्रहीतु । साधूंचा निरोपितु ।
ते आपुलिया परी अलंकरितु । भलतेसा ॥ ८२ ॥
तंव श्रीगुरु म्हणती राहीं । हें तुज बोलावें न लगे कांहीं ।
आतां ग्रंथा चित्त देईं । झडकरी गा ॥ ८३ ॥
या बोला निवृत्तिदासु । पावूनि परम उल्हासु ।
म्हणे परियेसा मना अवकाशु । देऊनियां ॥ ८४ ॥

धृतराष्ट्र उवाच —

धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।
मामकाः पाण्डवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १ ॥

तरी पुत्रस्नेहें मोहितु । धृतराष्ट्र असे पुसतु ।
म्हणे संजया सांगे मातु । कुरुक्षेत्रींची ॥ ८५ ॥

१ मान्य, माझ २ कळसूत्री लाकडी बाहुली ३ स्वाधीन केलेला. ४ घडेल तसा

जें धर्मालय म्हणिजे । तेथ पांडव आणि माझे ।
गेले असती व्याजें । झुंझाचेनि ॥ ८६ ॥
तरी तेंहीं येतुला अवसरीं । काय किजत असे येरयेरीं ।
तें झडकरी कथन करीं । मजप्रती ॥ ८७ ॥

संजय उवाच:—

दृष्ट्वा तु पांडवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ।
आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥ २ ॥
पश्यैतां पांडुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् ।
व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥ ३ ॥

तिये वेळीं तो संजय बोले । म्हणे पांडवसैन्य उचललें ।
जैसें महाप्रळयीं पसरलें । कृतांतमुख ॥ ८८ ॥
तैसें तें घनदाट । उठावलें एकवाट ।
जैसें उसळलें कालकूट । धरी कवण ॥ ८९ ॥
ना तरी वडवानलु सांदुकला । प्रलयवातें पोखला ।
सागर शोषूनि उधवला । अंबरासी ॥ ९० ॥
तैसें दळ दुर्धर । नाना व्यूहीं परिकर ।
अवगमलें भयासुर । तिये काळीं ॥ ९१ ॥
तें देखोनियां दुर्योधनें । अव्हेरिलें कवणें मानें ।
जैसें न गणिजे पंचाननें । गजघटांतें ॥ ९२ ॥
मग द्रोणापासीं आला । तयातें म्हणे हा देखिला ।
कैसा दळभारु उचलला । पांडवांचा ॥ ९३ ॥
गिरिदुर्ग जैसे चालते । तैसे विविध व्यूह भंवते ।
रचिले आथी बुद्धिमंतें । द्रुपदकुमरें ॥ ९४ ॥

१ भडकला, २ पोसला, वाढला, ३ उसळला, उंचावला.

जो कां तुम्हीं शिकविला। विद्येसी वसौटा केला।
तेणें हा सैन्यसिंधु पाखरिला। देखदेख ॥ ९५ ॥

अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि।
युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥ ४ ॥

आणीकही असाधारण। जे शस्त्रास्त्रीं प्रवीण।
क्षात्रधर्मी निपुण। वीर आहाती ॥ ९६ ॥
बळें प्रौढी पौरुषें। जे भीमार्जुनासारिखे।
ते सांगेन कौतुकें। प्रसंगेंचि ॥ ९७ ॥
एथ युयुधानु सुभटु। आला असे विराटु।
महारथी श्रेष्ठु। द्रुपदु वीरु ॥ ९८ ॥

धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान्।
पुरुजित्कुंतिभोजश्च शैब्यश्च नरपुंगवः ॥ ५ ॥
युधामन्युश्च विक्रांत उत्तमौजाश्च वीर्यवान्।
सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥ ६ ॥

चेकितान धृष्टकेतु। काशिराज वीर विक्रांतु।
उत्तमौजा नृपनाथु। शैब्य देख ॥ ९९ ॥
हा कुंतिभोज पाहें। एथ युधामन्यु आला आहे।
आणि पुरुजितादी राय हे। सकळ देख ॥ १०० ॥
हा सुभद्राहृदयनंदनु। जो अपरु नवा अर्जुनु।
तो अभिमन्यु म्हणे दुर्योधनु। देखें द्रोणा ॥ १ ॥
आणीकही द्रौपदीकुमर। हे सकळही महारथी वीर।
मिती नेणिजे अपार। मीनले असती ॥ २ ॥

१ शिकविला, २ स्थान, निवास, आश्रयस्थल, ३ पसरला.

अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम ।
नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान्ब्रवीमि ते ॥ ७ ॥
भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः ।
अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥ ८ ॥

आतां आमुच्या दळीं नायक । जे रूढवीर सैनिक ।
ते प्रसंगें आइक । सांगिजती ॥ ३ ॥
उद्देशें एक दोनी । जाइजती बोलोनी ।
तुम्ही आदिकरूनी । मुख्य जे जे ॥ ४ ॥
हा भीष्म गंगानंदनु । जो प्रतापतेजस्वी भानु ।
रिपुगज-पंचाननु । कर्ण वीरु ॥ ५ ॥
या एकेकाचेनि मनोव्यापारें । हें विश्व होय संहरे ।
हा कृपाचार्यु न पुरे । एकलाचि ॥ ६ ॥
एथ विकर्ण वीरु आहे । हा अश्वत्थामा पैल पाहें ।
याचा आडदरु सदा वाहे । कृतांतु मनीं ॥ ७ ॥
समितिंजयो सौमदत्ति । ऐसे आणीकही बहुत आहाती ।
जयांचिया बळाची मिती । धाता नेणे ॥ ८ ॥

अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः ।
नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥ ९ ॥

जे शास्त्रविद्यापारंगत । मंत्रावतार मूर्त ।
हो कां जें अस्त्रजात । एथूनि रूढ ॥ ९ ॥
हे अप्रतिमल्ल जगीं । पुरता प्रतापु अंगीं ।
परी सर्व प्राणें मजचिलागीं । आराइले ॥ ११० ॥

१ मुरलेले, अनुभविक, रुळलेले, घटलेले. २ प्रतिमल्ल (जोडीचा मल्ल), ज्यांना नाहीं असे.

ततः शङ्खाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः ।
सहसैवाभ्यहन्यंत स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥ १३ ॥

उद्दंड सैघ वाजत । भयानकें खाखातें ।
महाप्रळयो जेथें । धांकडांसी ॥ ३१ ॥
तेथ भेडांची कवण मातु । काचेया केर फिटतु ।
जेणें दचकला कृतांतु । आंग नेघे ॥ ३२ ॥
भेरी निशाण मांदळ । शंख काहळ मोंगळ ।
आणि भयासुर रणकोल्हाळ । सुभटांचे ॥ ३३ ॥
आवेशें भुजा त्राहाटिती । विसंणेलें हांका देती ।
जेथ महामद भैद्रजाती । आवरती ना ॥ ३४ ॥
एकां उमेयांचि प्राण गेले । चांगांचे दांत बैसले ।
बिरुदांचे दांदुले । टिंचतांती ॥ ३५ ॥
ऐसा अद्भुत तुरबवाळु । आइकोनि ब्रह्मा व्याकुळु ।
देव म्हणती प्रळयकाळु । वोढवला आजी ॥ ३६ ॥

ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यंदने स्थितौ ।
माधवः पांडवश्चैव दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः ॥ १४ ॥
पांचजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः ।
पौण्ड्रं दध्मौ महाशंखं भीमकर्मा वृकोदरः ॥ १५ ॥
अनंतविजयं राजा कुंतीपुत्रो युधिष्ठिरः ।
नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥ १६ ॥

ऐसी स्वर्गी मातु । देखोनि तो आकांतु ।
तव पांडवदळाआंतु । वर्तलें कायी ॥ ३७ ॥

१ धीटाना २ युद्धाविष्ट झालेले ३ हत्ती, ४ प्रतिज्ञा करून लढणारे बलाढ्य वीर ५ थरथर कांपतात. ६ रणवाद्याचा कडाका

हो कां निजसार विजयाचें । कीं तें भांडार महातेजाचें ।
जेथ गरुडाचिये जोवळिचे । कांतले चाऱ्ही ॥ १३८ ॥
कीं पाखांचा मेरु जैसा । रहंवरु मिरवतसे तैसा ।
तेजें कोंदाटलिया दिशा । जयाचेनि ॥ ३९ ॥
जेथ अश्ववाहकु आपण । वैकुंठींचा राणा जाण ।
तया रथाचे गुण । काय वर्णूं ॥ १४० ॥
ध्वजेवरी वानरु । तो मूर्तिमंत शंकरु ।
सारथी शार्ङ्गधरु । अर्जुनेंसीं ॥ ४१ ॥
देखा नवल तया प्रभूचें । अद्भुत प्रेम भक्ताचें ।
जे सारथ्य पार्थाचें । करितु असे ॥ ४२ ॥
पाइकु पाठीसीं घातला । आपण पुढां राहिला ।
तेणें पांचजन्यु आस्फुरिला । अवलीळाचि ॥ ४३ ॥
परी तो महाघोषु थोरु । गर्जतु असे गहिरु ।
जैसा उदेला दिनकरु । लोपी नक्षत्रांतें ॥ ४४ ॥
तैसे तुरबंबाळु भंवते । कौरवदळीं गाजत होते ।
ते हारपोनि नेणों केउते । गेले तेथ ॥ ४५ ॥
तैसाचि देखें येरें । निनादें अतिगहिरें ।
देवदत्त धनुर्धरें । आस्फुरिला ॥ ४६ ॥
ते दोन्ही शब्द अचाट । मीनले एकवट ।
तेथ ब्रह्मकटाह शतकूट । हों पाहत असे ॥ ४७ ॥
तंव भीमसेनु विसणैला । जैसा महाकाळु खवळला ।
तेणें पौंड्र आस्फुरिला । महाशंखु ॥ ४८ ॥

१ जुळे भाऊ ( जोडीचे. ). २ जोडले. ३ रथ. ४ सेवक. ५ सहज, खेळानें ६ गंभीर, खोल.

तो महाप्रलयजलधरु । जैसा घडघडिला गहिरु ।
तंव अनंतविजयो युधिष्ठिरु । आस्फुरिता जाला ॥ ४९ ॥
नकुळें सुघोषु । सहदेवें मणिपुष्पकु ।
जेणें नादें अंतकु । गजबजला ठाके ॥ १५० ॥

काश्यश्च परमेष्वासः शिखंडी च महारथः ।
धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥ १७ ॥
द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ।
सौभद्रश्च महाबाहुः शङ्खान् दध्मुः पृथक् पृथक् ॥ १८ ॥
स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ।
नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥ १९ ॥

तेथ भूपती होते अनेक । द्रुपद द्रौपदेयादिक ।
हा काशीपति देख । महाबाहु ॥ ५१ ॥
तेथ अर्जुनाचा सुतु । सात्यकि अपराजितु ।
धृष्टद्युम्नु नृपनाथु । शिखंडी हन ॥ ५२ ॥
विराटादि नृपवर । जे सैनिकमुख्य वीर ।
तिहीं नानाशंख निरंतर । आस्फुरिले ॥ ५३ ॥
तेणें महाघोषनिर्घातें । शेषकूर्म अवचितें ।
गजबजोनि भूभारातें । सांडू पाहती ॥ ५४ ॥
तेथ तीन्ही लोक डळमळित । मेरुमंदर आंदोळित ।
समुद्रजळ उसळत । कैलासवेरी ॥ ५५ ॥
पृथ्वीतळ उलथों पाहात । आकाश असे आंसुडत ।
तेथ सडा होत । नक्षत्रांचा ॥ ५६ ॥
सृष्टि गेली रे गेली । देवां मोकळवांदी जाहली ।
पेंडी एक टाळी पिटिली । सत्यलोकीं ॥ ५७ ॥

१ हिसडलें २ घेर, वृष्टि, ३ निराश्रित अवस्था, अनाथ स्थिति.

दिहींचि दिन थोकेला । जैसा प्रळयकाळ मांडला ।
तैसा हाहाकारु उठिला । तिहीं लोकीं ॥ ५८ ॥
तंव आदिपुरुप विस्मितु । म्हणे क्षणें होय अंतु ।
मग लोपिला अद्भुतु । संभ्रमु तो ॥ ५९ ॥
म्हणोनि विश्व संवरलें । एऱ्हवीं युगान्त होतें वोडवलें ।
जें महाशंख आस्फुरिले । कृष्णादिकीं ॥ १६० ॥
तो घोप तरी उपसंहरला । परी पडिसाद होता राहिला ।
तेणें दळभार विध्वंसिला । कौरवांचा ॥ ६१ ॥
जैसा गजघटाआंतु । सिंह लीला विदारितु ।
तैसा हृदयातें भेदितु । कौरवांचिया ॥ ६२ ॥
तो गाजत जंव आइकती । तंव उभेचि हियें घालिती ।
एकमेकांतें म्हणती । सावध रे सावध ॥ ६३ ॥

अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान्कपिध्वजः ।
प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पांडवः ॥ २०

तेथ बळें प्रौढी पुरते । महारथी वीर होते ।
तिहीं पुनरपि दळातें । आवरिलें ॥ ६४ ॥
मग सरिसेपणें उठावले । दुणवटोनि उचलले ।
तया दंडीं क्षोभलें । लोकत्रय ॥ ६५ ॥
तेथ बाणवरी धनुर्धर । वर्पताती निरंतर ।
जैसे प्रळयांत जलधर । अनिवार कां ॥ ६६ ॥
तें देखलिया अर्जुनें । संतोष घेऊनि मनें ।
मग संभ्रमें दिठी सेने । घालितसे ॥ ६७ ॥

---

१ दिवसासच. २ थांबला, संपला. ३ हृदयें, वक्षःस्थळें. ४ जुटीनें, तयारीनें.

तेथ मनीं गजबज जाहाली । आणि आपैसी कृपा आली ।
तेणें अपमानें निघाली । वीरवृत्ति ॥ ८५ ॥
जिया उत्तम कुळींचिया होती । आणि गुणलावण्य आथी ।
तिया आणिकीतें न साहती । सुतेजपणें ॥ ८६ ॥
नविये आवडीचेनि भरें । कामुक निज वनिता विसरे ।
मग पाडेंवीण अनुसरे । भ्रमला जैसा ॥ ८७ ॥
कीं तपोबळें ऋद्धी । पातलिया भ्रंशे बुद्धि ।
मग तया विरक्तासिद्धि । आठवेना ॥ ८८ ॥
तैसें अर्जुना तेथ जाहलें । असतें पुरुषत्व गेलें ।
जें अंतःकरण दिधलें । कारुण्यासी ॥ ८९ ॥
देखा मंत्रज्ञ बरळु जाये । मग तेथ कां जैसा संचारु होये ।
तैसा तो धनुर्धर महामोहें । आकळिला ॥ १९० ॥
म्हणऊनि असता धीरु गेला । हृदया द्रावो आला ।
जैसा चंद्रकळा शिवतला । सोमकांतु ॥ ९१ ॥
तयापरी पार्थु । अतिस्नेहें मोहितु ।
मग सखेद असे बोलतु । श्रीअच्युतेसीं ॥ ९२ ॥

कृपया परयाविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ।
अ. उ. दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥ २८ ॥
सीदंति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ।
वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥ २९ ॥
गांडीवं स्रंसते हस्तात्त्वक्चैव परिदह्यते ।
न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥ ३० ॥

तो म्हणे अवधारीं देवा । म्यां पाहिला मेळावा ।
तंव गोत्रवर्गु आघवा । देखिला एथ ॥ ९३ ॥

१ अमर्यादपणें. २ वारें, भूताची झपाटणी. ३ स्पर्शला.

हे संग्रामीं उदित । जहाले असती कीर समस्त ।
पण आपणपेयां[1] उचित । केवीं होय ॥ ९४ ॥
येणें नांवेंचि नेणों कायी । मज आपणपें सर्वथा नाहीं ।
मनोबुद्धी ठायीं । स्थिर नोहे ॥ ९५ ॥
देखें देह कांपत । तोंड असे कोरडें होत ।
विकळता उपजत । गात्रांसीही ॥ ९६ ॥
सर्वांगा कांटाळा[2] आला । अतिसंतापु उपनला[3] ।
तेथें वेंवळ[4] हातु गेला । गांडीवाचा ॥ ९७ ॥
तें न धरतचि निष्टलें । परि नेणेंचि हातोनि पडिलें ।
ऐसें हृदय असे व्यापिलें । मोहें येणें ॥ ९८ ॥
जें वज्रापासोनि कठिण । दुर्धर अतिदारुण ।
तयाहून असाधारण । हें स्नेह नवल ॥ ९९ ॥
जेणें संग्रामीं हरु जिंतिला । निवातकवचांचा ठांवो फेडिला[5]
तो अर्जुन मोहें कवळिला । क्षणामाजीं ॥ २०० ॥
जैसा भ्रमर भेदी कोडें । भलतैसें काष्ठ कोरडें ।
परि कळिकेमाजीं सांपडे । कोंवळिये ॥ १ ॥
तेथ उत्तीर्ण होईल प्राणें । परि तें कमळदळ चिरूं नेणे ।
तैसें कठिण कोवळेंपणें । स्नेह देखा ॥ २ ॥
हे आदिपुरुषाची माया । ब्रह्मेयाही नयेचि आया ।
म्हणवूनि भुलविला ऐकें राया । संजयो म्हणे ॥ ३ ॥
अवधारीं मग तो अर्जुनु । देखोनि सकळ स्वजनु ।
विसरला अभिमानु । संग्रामींचा ॥ ४ ॥

---

१ आपल्याला. २ कांटा, रोमांच. ३ उपजला. ४ बळहीन, शिथिल. ५ नांवगांव पुसून टाकलें.

केसी नेणों सदयता। उपनली तेथें चित्ता।
मग म्हणे कृष्णा आर्ता। नासिजे एथ ॥ ५ ॥
माझें अतिशयें मन व्याकुळ। होतसे वाचा वरळ।
जे वधावे हे सकळ। येणें नांवें ॥ ६ ॥

निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव।
न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥ ३१ ॥

या कौरवां जरी वधावें। तरी युधिष्ठिरादिकां कां न वधावें?
हे येरयेर आघवे। गोत्रज आमुचे ॥ ७ ॥
म्हणोनि जळो हें झुंज। मत्यया नये मज।
पणें काय काज। महापापें ॥ ८ ॥
देवा बहुतीं परी पाहतां। एथ वोखटें होईल झुंजतां।
वर कांहीं चुकवितां। लाभु आथी ॥ ९ ॥

न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च।
किं नो राज्येन गोविंद किं भोगैर्जीवितेन वा ॥ ३२ ॥
येषामर्थे कांक्षितं नो राज्यं भोगाः सुखानिच।
त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥३३॥
आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः।
मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबंधिनस्तथा ॥३४॥

तया विजयवृत्ती कांहीं। मज सर्वथा काज नाहीं।
एथ राज्य तरी कायी। हें पाहुनियां ॥ २१० ॥
या सकळांतें वधावें। मग जे भोग भोगावे।
ते जळोत आघवे। पार्थु म्हणे ॥ ११ ॥
तेणें सुखेंविण होईल। तें [१]भलतेंस साहिजेल।
वरी जीवितही वेचिजेल। याचिलागीं ॥ १२ ॥

१ या कारणानें

परी यांसी घातु कीजे । मग आपण राज्यसुख भोगिजे ।
हें स्वप्नींही मन माझें । करूं न शके ॥ १३ ॥
तरी आम्हीं कां जन्मावें । कवणालागीं जियावें ।
जरी वडिलां यां चितावें । विरुद्ध मनें ॥ १४ ॥
पुत्रातें इच्छी कुळ । तयाचें कायि हेंचि फळ ।
जे निर्दळिजे केवळ । गोत्र आपुलें ॥ १५ ॥
हें मनींचि केविं धरिजे । आपण वज्राचे या होइजे ।
वरी घडे तरी कीजे । भलें इयां ॥ १६ ॥
आम्हीं जें जें जोडावें । तें समस्तीं इहीं भोगावें ।
हें जीवितही उपकारावें । काजीं यांच्या ॥ १७ ॥
आम्हीं दिगंतींचे भूपाळ । विभांडूनि सकळ ।
मग संतोषविजे कुळ । आपुलें जें ॥ १८ ॥
तेचि हे समस्त । परी कैसें कर्म विपरीत ।
जे जाहले असती उद्यत । झुंजावया ॥ १९ ॥
अंतोरियां कुमरें । सांडोनियां भांडारें ।
शस्त्राग्रीं जिव्हारें । आरोपुनी ॥ २१० ॥
ऐसियांतें कैसेनि मारूं । कवणावरी शस्त्र धरूं ।
निज हृदया करूं । घातु केवीं ॥ २१ ॥
हे नेणसी तूं कवण । परी पैं भीष्म द्रोण ।
जयांचे उपकार असाधारण । आम्हां बहुत ॥ २२ ॥
एथ शालक सासरे मातुळ । आणि बंधु कीं हे सकळ ।
पुत्र नातू केवळ । इष्टहीं असती ॥ २३ ॥
अवधारीं अति जवळिकेचे । हे सकळही सोयरे आमुचे ।
म्हणोनि दोष आथी वाचे । बोलतांचि ॥ २४ ॥

१ जगावें. २ स्त्रिया.

एतान्न हंतुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन ।
अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥ ३५ ॥

हे वरी भलतें करितु । आतांचि येथें मारितु ।
परि आपण मनें घातु । न चिंतावा ॥ २५ ॥
त्रैलोक्यींचे अनकळित । जरी राज्य होईल प्राप्त ।
तरी हे अनुचित । नाचरें मी ॥ २६ ॥
जरी आजि एथ ऐसें कीजे । तरी कवणाच्या मनीं उरिजे ।
सांगें मुख केवीं पाहिजे । तुझें कृष्णा ॥ २७ ॥

निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन ।
पापमेवाश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः ॥ ३६ ॥

जरी वधु करूनि गोत्रजांचा । तरी वसौटा होऊनि दोषांचा ।
मज जोडिलासि तूं हातींचा । दुरी होसी ॥ २८ ॥
कुळहरणीं पातकें । तियें आंगीं जडती अशेखें ।
तये वेळीं तूं कवणें कें । देखावासी ॥ २९ ॥
जैसा उद्यानामाजीं अनळु । संचरला देखोनि प्रबळु ।
मग क्षणभरी कोकिळु । स्थिर नोहे ॥ २३० ॥
का सकर्दम सरोवरु । अवलोकूनि चकोरु ।
न सेवितु अव्हेरु । करूनि निघे ॥ ३१ ॥
तयापरी तूं देवा । मज झांकऊं न येसी मावा ।
जरी पुण्याचा वोलावा । नाशिजैल ॥ ३२ ॥

तस्मान्नार्हा वयं हंतुं धार्तराष्ट्रान्स्वबांधवान् ।
स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥ ३७ ॥

---

१ घर. २ मायेची पाखर घालण्याला.

म्हणोनि मी हें न करीं । इयें संग्रामीं शस्त्र न धरीं ।
हें किडाळ बहुती परी । दिसतसे ॥ ३३ ॥
तुजशीं अंतराय होईल । मग सांगें आमचें काय उरेल ।
तेणें दुःखें हियें फुटेल । तुजवीण कृष्णा ॥ ३४ ॥
म्हणऊनि कौरव हे वधिजती । मग आम्हीं भोग भोगिजती ।
हे असो मात अघडती । अर्जुन म्हणे ॥ ३५ ॥

यद्यप्येते न पश्यंति लोभोपहतचेतसः ।
कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥ ३८ ॥
कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् ।
कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥ ३९ ॥

हे अभिमानमदें भुलले । जरी पां संग्रामा आले ।
तन्ही आम्ही हित आपुलें । जाणावें लागे ॥ ३६ ॥
हें ऐसें कैसें करावें । जे आपले आपण मारावे ।
जाणत जाणतांचि सेवावें । काळकूट ॥ ३७ ॥
हां जी मार्गी चालतां । पुढां सिंह जाहला अवचिता ।
तो तंव चुकवितां । लाभु आथी ॥ ३८ ॥
असता प्रकाशु सांडावा । मग अंधकूप आश्रावा ।
तरी तेथ कवणु देवा । लाभु सांगें ॥ ३९ ॥
कां समोर अग्नि देखोनी । जरी न वचिजे वोसंडोनी ।
तरी क्षणीं एका कवळूनि । जाळूं सके ॥ ४० ॥
तैसे दोष हे मूर्त । अंगीं वाजों असती पाहात ।
हें जाणतांही केवीं पथ । प्रवर्तावें ॥ ४१ ॥
ऐसें पार्थ तिये अवसरीं । म्हणे देवा अवधारीं ।
या कल्मषाची थोरी । सांगेन तुज ॥ ४२ ॥

१ आडकाठी, प्रतिबंध. २ हृदय, छाती. ३ पडूं, कोसळूं.

कुलक्षये प्रणश्यति कुलधर्मा: सनातना ।
धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥ ४० ॥
जैसें काष्ठ मथिजे । तेथ वन्हि एक उपजे ।
तेणें काष्ठजात जाळिजे । प्रज्वळलेनि ॥ ४३ ॥
तैसा गोत्रींचि परस्परें । जरी वधु घडे मत्सरें ।
तरी तेणें महादोषें घोरें । कुळचि नाशे ॥ ४४ ॥
म्हणवूनि एणें पापें । वंशजधर्मु लोपे ।
मग अधर्मुचि आरोपे । कुळामाजी ॥ ४५ ॥
अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यन्ति कुलस्त्रियः ।
स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकर: ॥ ४१ ॥
तेथ सारासार न विचारावें । कवण काय आचरावें ।
आणि विधिनिषेध आघवे । पारुषती[१] ॥ ४६ ॥
असता दीपु दवडिजे । मग अंधकारीं राहाटिजे ।
तरी उजूचि आडळिजे । जयापरी ॥ ४७ ॥
तैसा कुळीं कुळक्षयो होये । तये वेळीं तो आद्यधर्मु जाये ।
मग आन काही आहे । पापावांचुनी ॥ ४८ ॥
जै यमनियम ठाकती । तेथ इंद्रिय सैरा राहाटती ।
म्हणऊनि व्यभिचार घडती । कुळस्त्रियासी ॥ ४९ ॥
उत्तम अधर्मी संचरती । ऐसे वर्णावर्ण मिसळती ।
तेथ समूळ उपडती । जातिधर्म ॥ २५० ॥
जैसीं चोहटांचिये बळी[२] । पाविजे सैरा काउळीं ।
तैसीं महापापें कुळीं । प्रवेशती ॥ ५१ ॥
संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ।
पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिंडोदकक्रिया: ॥ ४२ ॥

१ वागतात, चालतात २ चव्हाट्यावरच्या.

मग कुळा तया अशेखा । आणि कुळघातकां ।
येरयेरां नरका । जाणें आथि ॥ ५१ ॥
देखें वंशवृद्धि समस्त । यापरी होय पतित ।
मग वोवांडती स्वर्गस्थ । पूर्वपुरुष ॥ ५३ ॥
जेथ नित्यादि क्रिया ठाके। आणि नैमित्तिक क्रिया पारुखे।
तेथ कवणा तिळोदकें । कवण अर्पी ॥ ५४ ॥
तरी पितर काय करिती । कैसेनि स्वर्गीं वसती ।
म्हणोनि तेही येती । कुळापासीं ॥ ५५ ॥
जैसा नखाग्रीं व्याळु लागे । तो शिखांत व्यापी वेगें ।
तेवीं आब्रह्म कुळ आवघें । आप्लविजे ॥ ५६ ॥

दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ।
उत्साद्यंते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥ ४३ ॥
उत्सन्न कुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ।
नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥ ४४ ॥
अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् ।
यद्राज्यसुखलोभेन हंतुं स्वजनमुद्यताः ॥ ४५ ॥

देवा अवधारीं आणीक एक । एथ घडे महापातक ।
जे संगदोषें हा लौकिक । भ्रंशु पावे ॥ ५७ ॥
जैसा घरीं आपुलां । वैनिवसें अग्नि लागला ।
तो आणिकांही प्रज्वळिला । जाळूनि घाली ॥ ५८ ॥
तैसिया तया कुळसंगती । जे जे लोक वर्तती ।
तेही बाधा पावती । निमित्तें येणें ॥ ५९ ॥
तैसें नाना दोषें संकुळ । अर्जुन म्हणे तें कुळ ।
मग महाघोर केवळ । निरय भोगी ॥ २६० ॥

१ माघारी फिरते, रमते. २ बुडविलें जातें. ३ दैववशात्, अकस्मात्.

पाडलिया तिये ठायीं । मग कल्पांतीही उंकलु नाहीं ।
येसणे पतन कुळक्षयीं । अर्जुन म्हणे ॥ ६१ ॥
देवा हे विविध कार्ली ऐकिजे । परी अझुनिवरी त्रासु नुपजे ।
हृदय वज्राचे हे काय कीजे । अवधारीं पां ॥ ६२ ॥
अपेक्षिजे राज्यसुख । जयालागीं ते तंव क्षणिक ।
ऐसें जाणतांही दोख । अव्हेरूं ना ॥ ६३ ॥
जे हे वडिल सकळ आपुले । वधावया दिठी सूंदले ।
सांग पां काइ थेकुलें । घडले आम्हां ॥ ६४ ॥

यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणय ।
धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥ ४६ ॥

आतां यावरी जें जियावें । तयापासूनि हे वरवें ।
जे शस्त्र सांडूनि साहावे । बाण यांचे ॥ ६५ ॥
इयावरी होय जितुकें । ते मरणही वरी निकें
परी येणे कल्मषें । चाड नाहीं ॥ ६६ ॥

संजयउवाच—

एवमुक्त्वाऽर्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत्
विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानस. ॥ ४७ ॥

ऐसें तिये अवसरीं । अर्जुन बोलिला समरीं ।
संजयो म्हणे अवधारीं । धृतराष्ट्राते ॥ ६७ ॥
मग अत्यंत उद्वेगला । न धरत गहिंवरू आला ।
तेथ उडी घातली खालीं । रथौनियां ॥ ६८ ॥
जेसा राजकुमरु पदच्युतु । सर्वथा होय उपहतु ।
कां रवि राहुग्रस्तु । प्रभाहीनु ॥ ६९ ॥

१ सुग्रा २ घातले

ॐ नमो भगवते वासुदेवाय





## अध्याय दुसरा

संजय उवाच —

तं तथा कृपयाविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम् ।
विषीदंतमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः ॥ १ ॥

मग संजयो म्हणे रायातें । आइकें तो पार्थु तेथें ।
शोकाकुल रुदनातें । करीत असे ॥ १ ॥
ते कुळ देखोनि समस्त । स्नेह उपनलें अद्भुत ।
तेणें द्रवलें असे चित्त । कवणेपरी ॥ २ ॥
जैसें लवण जळें झळंबलें । ना तरी अभ्र वातें हालें ।
तैसें सधीर परी विरमलें । हृदय तयाचें ॥ ३ ॥
म्हणौनी कृपा आकळिला । दिसतसे अति कोमाइला ।
जैसा कर्दमीं रुपला । राजहंसु ॥ ४ ॥
तयापरी तो पांडुकुमरु । महामोहें अति जर्जरु ।
देखोनी श्रीशार्ङ्गधरु । काय बोले ॥ ५ ॥

श्रीभगवानुवाच—

कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम् ।
अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ॥ २ ॥

---

१ विरघळलें.

म्हणे अर्जुना आधीं पाहीं । हें उचित काय इये ठायीं ।
तूं कवण हें कायी । करीत आहासी ॥ ६ ॥
तुज सांगें काय झालें । कवण उणें आलें ।
करितां काय ठेलें । खेदु कायिसा ॥ ७ ॥
तूं अनुचिता चित्त नेदिसी । धीरु कंहीं न सांडिसी ।
तुझिया नामें अपयशीं । दिशा लंघिजे ॥ ८ ॥
तूं शूरवृत्तीचा ठावो । क्षत्रियांमाजी रावो ।
तुझिया लाठेपणाचा आंवो । तिहीं लोकीं ॥ ९ ॥
तुवां संग्रामीं हरु जिंकिला । निवातकवचांचा ठावो फेडिला
पवाडा तुवां केला । गंधर्वासी ॥ १० ॥
पाहतां तुझेनि पाडें । दिसे त्रैलोक्यही थोकडें ।
ऐसें पुरुषत्व चोखडें । पार्था तुझें ॥ ११ ॥
तो तूं कीं आजि एथें । सांडूनियां वीरवृत्तीतें ।
*अधोमुख रुदनातें । करीतु आहासी ॥ १२ ॥*
विचारीं तूं अर्जुनु । कीं कारुण्यें किजसी दीनु ।
सांगपां अंधकारें भानु । ग्रासिला आथी ॥ १३ ॥
ना तरी पवनु मेघासि बिहे । कीं अमृतासि मरण आहे ।
पाहे पां इंधनाचि गिळोनि जाये । पावकातें ॥ १४ ॥
कीं लवणेंचि जळ विरे । संसर्गें काळकूट मरे ।
सांग पां महाफणी दर्दुरें । गिळिजे कायी ॥ १५ ॥
सिंहासि झोंबे कोल्हा । ऐसा अपाडु आथि कें जाहला ।
परी तो त्वां साच केला । आजि एथ ॥ १६ ॥
म्हणोनि अझुनी अर्जुना । झणें चित्त देसी या हीना ।
वेगीं धीर करूनियां मना । सावधु होईं ॥ १७ ॥

१ पराक्रमाचा. २ आकार, स्वरूप. ३ तुलनेनें. ४ चमत्कार, अद्भुत गोष्ट.

सांडीं हें मूर्खपण । उठीं घे धनुष्यबाण ।
संग्रामीं हें कवण । कारुण्य तुझें ॥ १८ ॥
हां गा तूं जाणता । तरी न विचारिसी कां आतां ।
सांगें झुंझावेळे सदयता । उचित कायी ॥ १९ ॥
हें असतिये कीर्तीसी नाशु । आणि पारत्रिकासि अपभ्रंशु ।
म्हणे जगन्निवासु । अर्जुनातें ॥ २० ॥

क्लैब्यं मास्मगमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते ।
क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥ ३ ॥

म्हणोनि शोकु न करीं । तूं पुरता धीरु धरीं ।
हे शोच्यता अव्हेरीं । पांडुकुमरा ॥ २१ ॥
तुज नव्हे हें उचित । येणें नासेल जोडलें बहुत ।
तूं अझुनि हित । विचारीं पां ॥ २२ ॥
येणें संग्रामाचेनि अवसरें । एथ कृपाळुपण नुपकरे ।
हे आतांचि काय सोयरे । जाहले तुज ॥ २३ ॥
तूं आधींचि काय नेणसी । कीं हे गोत्रज नोळखसी ।
वायांचि काय करिसी । अतिशो आतां ॥ २४ ॥
आजिचें हें झुंज । काय जन्मा नवल तुज ।
हें परस्परें तुम्हां व्याज । सदाचि आथी ॥ २५ ॥
तरी आतां काय जाहलें । कायी स्नेह उपनलें ।
हें नेणिजे परी कुडें केलें । अर्जुना तुवां ॥ २६ ॥
मोह धरिलिया ऐसें होईल । जे असती प्रतिष्ठा जाईल ।
आणि परलोकही अंतरेल । ऐहिकेंसीं ॥ २७ ॥

१ आयत्या, पदरांत पडलेल्या. २ परलोकगतीला, परमार्थाला. ३ नावडे, गैर.

हृदयाचें ढिलेपण । एथ निकंयासि नव्हे कारण ।
हें संग्रामीं पतन जाण । क्षत्रियासी ॥ २८ ॥
ऐसेनि तो कृपावंतु । नानापरी असे शिकवितु ।
हें ऐकोनि पांडुसुतु । काय बोले ॥ २९ ॥

अर्जुन उवाच—

कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन ।
इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥ ४ ॥

देवा हें येतुलेवरी । बोलावें नलगे अवधारीं ।
आधीं तूंचि विचारीं । संग्रामु हा ॥ ३० ॥
हें झुंज नव्हे प्रमादु । एथ प्रवर्तलिया दिसतसे बाधु ।
हा उघड लिंगभेदु । योढवला आम्हां ॥ ३१ ॥
देखें मातापितरें अर्चिजती । सर्वस्वें तोष पावविजती ।
तियें पाठीं केवीं वधिजती । आपुलिया हातीं ॥ ३२ ॥
देवा संतवृंद नमस्कारिजे । कां घडे तरी पूजिजे ।
हें वांचूनि केवीं निंदिजे । स्वयें वाचा ॥ ३३ ॥
तैसे गोत्रगुरु आमुचे । हे पूजनीय आम्हां नियमाचे ।
मज बहुत भीष्मद्रोणांचें । वर्ततसे ॥ ३४ ॥
जयांलागीं मनें वीरुं । आम्ही स्वप्नींही न शकों धरूं ।
तयां प्रत्यक्ष केवीं करूं । घातु देवा ॥ ३५ ॥
वरी जळो हें जियालें । एथ आघवेयांसि काय जाहलें ।
जे यांचया वधीं अभ्यासिलें । मिरविजे आम्हीं ॥ ३६ ॥
मी पार्थु द्रोणाचा केला । येणें धनुर्वेदु मज दिधला ।
तेणें उपकारें काय आभारेला । वधीं तयातें ॥ ३७ ॥

१ खचाला, खांगल्याला. २ पूज्य जनांचा उच्छेद केल्याचा दोष. ३ जगणें.

जेथींचिया कृपा लाहिजे वरु । तेथेंचि मनें व्यभिचारु ।
तरी काय मी भस्मासुरु । अर्जुन म्हणे ॥ ३८ ॥
गुरूनहत्वा हि महानुभावान्श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीहलोके ।
हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव भुंजीय भोगान् रुधिरप्रदिग्धान्॥५॥
देवा समुद्र गंभीर आइकिजे । वरी तोही आहाच देखिजे ।
परी क्षोभु मनीं नेणिजे । द्रोणाचिये ॥ ३९ ॥
हें अपार जे गगन । वरी तयाही होईल मान ।
परी अगाध भले गहन । हृदय याचें ॥ ४० ॥
वरी अमृतही विटे । कीं काळवशें वज्रही फुटे ।
परी मनोधर्मु न लोटे । विकरविलाही ॥ ४१ ॥
स्नेहालागीं माये । म्हणिपे तें कीरु होये ।
परी कृपा ते मूर्त आहे । द्रोणीं इये ॥ ४२ ॥
हा कारुण्याची आदि । सकल गुणांचा निधि ।
विद्यासिंधु निरवधि । अर्जुन म्हणे ॥ ४३ ॥
हा येणें मानें महंतु । वरी आम्हांलागीं कृपावंतु ।
आतां सांग पां येथ घातु । चिंतूं येईल ॥ ४४ ॥
ऐसे हे रणीं वधावे । मग आपण राज्यसुख भोगावें ।
ते मना न ये आघवें । जीवितेंसीं ॥ ४५ ॥
हें येणें मानें दुर्भर । जे यांहीहुनी भोग सधर ।
ते असतु येयवर । भिक्षा मागतां भली ॥ ४६ ॥
ना तरी देशत्यागें जाइजे । कां गिरिकंदर सेविजे ।
परी शस्त्र आतां न धरिजे । इयांवरी ॥ ४७ ॥

१ मापगी. २ त्याच्या वृत्तीन विकार उत्पन्न मरण्याचा प्रयत्न झाला असतांहि. ३ भार.

देवा नेवनिशर्ती शरीं । वोंवरोनी यांच्या जिव्हारीं ।
भोग गिंवसावे रुधिरीं । बुडाले जे ॥ ४८ ॥
ते काढूनि काय किजती । विलिप्त केवीं सेविजती ।
मज न ये हे उपपत्ति । याचिलागीं ॥ ४९ ॥
ऐसें अर्जुन तिये अवसरीं । म्हणे श्रीकृष्णा अवधारीं ।
परी तें मना नयेचि मुरारी । आइकोनियां ॥ ५० ॥
हें जाणोनि पार्थु विहाला । मग पुनरपि बोलों लागला ।
म्हणे देवो कां चित्त या बोला । देतीचि ना ॥ ५१ ॥
न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ॥
यानेव हत्वा न जिजीविषामस्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्त्तराष्ट्राः ६
येऱ्हवीं माझ्या चित्तीं जें होतें । तें मी विचारूनि बोलिलों एथें
परी निकें काय यापरौतें । तें तुम्ही जाणा ॥ ५२ ॥
पैं यांसि जयांसीं ऐकिजे । आणि या बोलींचि प्राणु सांडिजे ।
ते एथ संग्रामव्याजें । उभे आहाती ॥ ५३ ॥
आतां ऐसेयांतें वधावें । कीं अव्हेरूनियां निघावें ।
या दोहींमाजी काइ वरवें । तें नेणों आम्ही ॥ ५४ ॥
कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ।
यच्छ्रेयःस्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेहं शाधि मां त्वां प्रपन्नं ७
आम्हां काय उचित । तें पाहतां न स्फुरे एथ ।
जे मोहें येणें चित्त । व्याकुळ माझें ॥ ५५ ॥
तिमिरावरुद्ध जैसें । दृष्टीचें तेज भ्रंशे ।
मग पांसींच असतां न दिसे । वस्तुजात ॥ ५६ ॥

१ नवीन पाजविलेल्या. २ प्रहार करून. ३ कवटाळावे, उपभोगावे.
४ पूर्वापरसंगति. ५ मुरारीला. ६ जवळच.

आतां तो उद्गार कैसा वरुषेल । तेणें अर्जुनाचळु निवेल ।
मग नवी विरूढी फुटेल । उन्मेषाची ॥ ७९ ॥
ते कथा आइका । मनाचिये आराणुका ।
ज्ञानदेवो म्हणे देखा । निवृत्तिदासु ॥ ८० ॥

संजय उवाच—
एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतप ।
न योत्स्य इति गोविंदमुक्त्वा तूष्णीं बभूव ह ॥ ९ ॥

ऐसे संजयो असे सांगतु । म्हणे राया तो पार्थु ।
पुनरपि शोकाकुळितु । काय बोले ॥ ८१ ॥
आइकें सखेदु बोले श्रीकृष्णातें । आतां नाळवावें तुम्हीं मातें ।
मीं सर्वथा न झुंजे एथें । भरंवसेनी ॥ ८२ ॥
ऐसे येकिं हेळां बोलिला । मग मौन धरूनि ठेला ।
तेथें श्रीकृष्ण विस्मो पावला । देखोनि तयातें ॥ ८३ ॥

तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत ।
सेनयोरुभयोर्मध्ये विषीदंतमिदं वचः ॥ १० ॥

मग आपुलां चित्तीं म्हणे । एथ हें कायी आदरिलें येणें ।
अर्जुन सर्वथा काही नेणे । काय कीजे ॥ ८४ ॥
हा उमजे आतां कवणेपरी । कैसेनि धीरु स्वीकरी ।
जैसा ग्रहांतें पंचाक्षरी । अनुमानी कां ॥ ८५ ॥
ना तरी असाध्य देखोनि व्याधि । वैद्य सूंची निरवधि ।
अमृतासम दिव्य औषधि । निदानींची ॥ ८६ ॥
तैसे विवरीतु असे श्रीअनंतु । तया दोहीं सैन्यांआंतु ।
जयापरी पार्थु । भ्रांति सांडी ॥ ८७ ॥

१ पाल्वी, कोंब २ ज्ञानाची ३ स्वस्थतेनें. ४ एक वेळ, एकदम.
५ भुताला ६ योजतो, शोधून काढतो.

तें कारण मनीं धरिलें । मग सरोष बोलों आदरिलें ।
जैसें मातेच्या कोपीं थोकुलें । स्नेह आथी ॥ ८८ ॥
कीं औषधाचिया कडुवटपणीं । जैसी अमृताची पुरवणी ।
ते आहांच न दिसे परी गुणीं । प्रकट होय ॥ ८९ ॥
तैसीं वरिवरि पाहतां उदासें । आंत तरी अतिसुरसें ।
तियें वाक्यें हृषीकेशें । बोलों आदरिलीं ॥ ९० ॥

श्रीभगवानुवाच—

अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।
गतासूनगतासूंश्च नानुशोचंति पंडिताः ॥ ११ ॥

मग अर्जुनातें म्हणितलें । आम्हीं आजि हें नवल देखिलें ।
जें तुवां एथ आदरिलें । माझारींचि ॥ ९१ ॥
तूं जाणता तरी म्हणविसी । परी नेणिवेतें न संडिसी ।
आणि शिकवूं म्हणों तरी बोलसी । बहुसाल नीति ॥ ९२ ॥
जात्यंधा लागे पिसें । मग तें सैरा धांवे जैसें ।
तुझें शाहाणपण तैसें । दिसतसे ॥ ९३ ॥
तूं आंपणपें तरी नेणसी । परी या कौरवांतें शोचूं पहासी ।
हा बहु विस्मय आम्हांसी । पुढतपुढती ॥ ९४ ॥
तरी सांग पां अर्जुना । तुजपासूनि स्थिति या त्रिभुवना ।
हे अनादि विश्वरचना । तें लटकें कायी ॥ ९५ ॥
एथ समर्थु एक आथी । तयापासूनि भूतें होती ।
तरी हें वायांचि काय बोलती । जगामाजीं ॥ ९६ ॥
हो कां सांप्रत ऐसें जाहलें । जे हें जन्म तुवां सृजिलें ।
आणि नाशु पावे नाशिलें । विचारीं पां ॥ ९७ ॥

१ झांकलेलें. २ अन्तःस्थ साठवण, पूर्ण. ३ वरवर, उघड. ४ आपलें स्वरूप, आत्मतत्व. ५ वारंवार, पुन्हां पुन्हां.

तूं भ्रमलेपणें अहंकृती । यांसि घातु न धरिसी चित्तीं ।
तरी सांगें कायि हे होती । चिरंतन ॥ ९८ ॥
कीं तूं एक वधिता । आणि सकळ लोकु हा मरता ।
ऐसी भ्रांति झणें चित्ता । येवों देसी ॥ ९९ ॥
अनादिसिद्ध हें आघवें । होतजात स्वभावें ।
तरी तुवां कां शोचावें । सांगें मज ॥ १०० ॥
परी मूर्खपणें नेणसी । न चिंतावें तें चिंतिसी ।
आणि तूंचि नीति सांगसी । आम्हांप्रति ॥ १ ॥
देखें विवेकी जे होती । ते दोहींतेंही न शोचिती ।
जे होयजाय हे भ्रांती । म्हणऊनियां ॥ २ ॥

नत्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः ।
न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् ॥ १२ ॥

अर्जुना सांगेन आइक । पथ आम्ही तुम्ही देख ।
आणि हे भूपति अशेख । आदिकरुनी ॥ ३ ॥
नित्यता ऐसेंचि असोनी । ना तरी निश्चित क्षया जाउनी ।
हे भ्रांति वेगळी करुनी । दोन्ही नाहीं ॥ ४ ॥
हें उपजे आणि नाशे । तें मायावशें दिसे ।
येऱ्हवीं तत्त्वता वस्तु जे असे । ते अविनाशचि ॥ ५ ॥
जैसें पवनें तोय हालविलें । आणि तरंगाकार जाहलें ।
तरी कवण कें जन्मलें । म्हणों ये तेथ ॥ ६ ॥
तेंचि वायूचें स्फुरण ठेलें । आणि उदक सहज सपाट जाहलें
तरी आतां काय निमालें । विचारीं पां ॥ ७ ॥

देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा ।
तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ १३ ॥

१ परत्र.

आइकें शरीर तरी एक । परी वयसाभेद अनेक ।
हें प्रत्यक्षचि देख । प्रमाण तूं ॥ ८ ॥
एथ कौमारत्व दिसे । मग तारुण्यीं तें भ्रंशे ।
परी देहाचि हा न नाशे । एकेकासवें ॥ ९ ॥
तैसीं चैतन्याच्या ठायीं । इयें शरीरांतरें होती जाती पाहीं ।
ऐसें जाणे तया नाहीं । व्यामोहदुःख ॥ ११० ॥

मात्रास्पर्शास्तु कौंतेय शीतोष्णसुखदुःखदाः ।
आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ॥ १४ ॥

एथ नेणावया हेंचि कारण । जें इंद्रियां आधीनपण ।
तिहीं आकळिजे अंतःकरण । म्हणऊनि भ्रमे ॥ ११ ॥
इंद्रियें विषय सेविती । तेथ हर्ष शोकु उपजती ।
ते अंतर आप्लविती । संगें येणें ॥ १२ ॥
जयां विषयांच्या ठायीं । एकनिष्ठता कहीं नाहीं ।
तेथ दुःख आणि कांहीं । सुखही दिसे ॥ १३ ॥
देखें शब्दाची व्याप्ति । निंदा आणि स्तुति ।
तेथ द्वेषाद्वेष उपजती । श्रवणद्वारें ॥ १४ ॥
मृदु आणि कठिण । हे स्पर्शाचे दोन्ही गुण ।
जे वपूचेनि संगें कारण । संतोषखेदां ॥ १५ ॥
भ्यासुर आणि सुरेख । हें रूपाचें स्वरूप देख ।
जें उपजवी सुखदुःख । नेत्रद्वारें ॥ १६ ॥
सुगंधु आणि दुर्गंधु । हा परिमळाचा भेदु ।
जो घ्राणसंगें विषादु — तोषु देता ॥ १७ ॥

१ निरनिराळीं शरीरें. २ कीं, कारण. ३ अंतःकरण. ४ बुडवितात.
५ एकाच स्थितींत अविकृत राहण्याचा स्वभाव; शाश्वती.

तातलिया जगाकारणें । चंद्रें वोंचिलें चांदणें ।
तया सदोषा केविं म्हणें । सारखें हें ॥ ९० ॥
म्हणोनि तुम्हीं मज संतीं । मंथरूप जो हा त्रिजगतीं ।
उपयोग केला तो पुढती । निरुपम जी ॥ ९१ ॥
किंबहुना तुमचें केलें । धर्मकीर्तन हें सिद्धी गेलें ।
येथ माझें जी उरलें । पाईकपण ॥ ९२ ॥
आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ।
तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ॥ ९३ ॥
जे खळांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मी रती वाढो ।
भूतां परस्परें पडो । मैत्र जीवाचें ॥ ९४ ॥
दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो ।
जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥ ९५ ॥
वर्षत सकळमंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी ।
अनवरत भूतळीं । भेटो तयां भूतां ॥ ९६ ॥
चलां कल्पतरूंचे अरव । चेतनाचिंतामणीचे गांव ।
बोलते जे अर्णव । पीयूषाचे ॥ ९७ ॥
चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन ।
ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ॥ ९८ ॥
किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं ।
भजिजो आदिपुरुखीं । अखंडित ॥ ९९ ॥
आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकीं इये ।
दृष्टादृष्टविजयें । होआवें जी ॥ १८०० ॥
येथ म्हणे श्रीविश्वेशरावो । हा होईल दानपसावो ।
येणें वरें ज्ञानदेवो । सुखिया झाला ॥ १ ॥

१ वक्रदृष्टि. २ समुदाय. ३ अंकुर, कोंभ.

ऐसें युगीं वरी कळीं । आणि महाराष्ट्रमंडळीं ।
श्रीगोदावरीच्या कूळीं । दक्षिणिलीं ॥ २ ॥
त्रिभुवनैकपवित्र । अनादि पंचकोश क्षेत्र ।
जेथ जगाचें जीवनसूत्र । श्रीमहालया असे ॥ ३ ॥
तेथ इंदुवंशविलासु । जो सकळकळानिवासु ।
न्यायातें पोपी क्षितीशु । श्रीरामचंद्रु ॥ ४ ॥
तेथ महेशान्वयसंभूतें । श्रीनिवृत्तिनाथसुतें ।
केलें ज्ञानदेवें गीतें । देशीकार लेणें ॥ ५ ॥
एवं भारताच्या गांवीं । भीष्मनाम प्रसिद्ध पर्वीं ।
श्रीकृष्णार्जुनीं बरवीं । गोठी जे केली ॥ ६ ॥
जें उपनिषदांचें सार । सर्व शास्त्रांचें माहेर ।
परमहंसीं सरोवर । सेविजे जें ॥ ७ ॥
तिये गीतेचा कलशु । संपूर्ण हा अष्टादशु ।
म्हणे निवृत्तिदासु । ज्ञानदेवो ॥ ८ ॥
पुढती पुढती पुढती । इया ग्रंथपुण्यसंपत्ती ।
सर्वसुखीं सर्वभूतीं । संपूर्ण होइजे ॥ ९ ॥
शके बाराशतें बारोत्तरें । तैं टीका केली ज्ञानेश्वरें ।
सच्चिदानंदबाबा आदरें । लेखकु जाहला ॥ १८१० ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे मोक्षसंन्यासयोगो नाम अष्टादशोऽध्यायः

---

१ पाठभेद–यदुवंश.

## श्रीएकनाथ महाराजांनीं ज्ञानेश्वरी ग्रंथाचें संशोधन केल्यानंतर ज्ञानेश्वरीसंबंधानें केलेल्या ओंव्या–

श्रीशके पंधराशें साहोत्तरीं । तारणनामसंवत्सरीं ।
एकाजनार्दनें अत्यादरीं । गीता–ज्ञानेश्वरी प्रतिशुद्ध केली १
ग्रंथ पूर्वीच अतिशुद्ध । परि पाठांतरीं शुद्ध अबद्ध ।
तो शोधूनियां एवंविध । प्रतिशुद्ध सिद्ध ज्ञानेश्वरी ॥ २ ॥
नमो ज्ञानेश्वरा निष्कलंका। जयाची गीतेची वाचितां टीका।
ज्ञान होय लोकां । अतिभाविकां ग्रंथार्थियां ॥ ३ ॥
बहुकाळपर्वणी गोमटी । भाद्रपदमास कपिलाषष्ठी ।
प्रतिष्ठानीं गोदातटीं । लेखनकामाठीं संपूर्ण जाहली ॥ ४ ॥
ज्ञानेश्वरीपाठीं । जो ओंवी करील मऱ्हाटी ।
तेणें अमृताचे ताटीं । जाण नरोटी ठेविली ॥ ५ ॥

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

## श्रीज्ञानेश्वरीमाहात्म्य

भाव धरूनियां वाची ज्ञानेश्वरी । कृपा करी हरि तयावरी १
स्वमुखें आपण सांगे तो श्रीविष्णु । श्रीगीता हा प्रश्नु अर्जुनेंसीं २
तेचि ज्ञानेश्वरी वाचे वदतां साचे । भय कळिकाळाचें नाहीं तया।
एका जनार्दनीं संशय सांडोनी । दृढ धरीं मनीं ज्ञानेश्वरी ४

---

ज्ञानराज माझी योग्यांची माउली। जेणें निगमवल्ली प्रगट केली।
गीताअलंकार नाम ज्ञानेश्वरी । ब्रह्मानंदलहरी प्रगट केली २